**उभारणीखालील १२५० टीसीडी क्षमतेच्या सहकारी साखर कारखान्यांना सुधारित प्रकल्प किंमत रुपये ४५.०० कोटी प्रमाणे वाढीव शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका-१०१४ /प्र.क्र.५७/ ३-स**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१५

<u>वाचा</u> :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका २६९९/ प्र.क्र.१८५/ ३ स, दि. ४.८.२०००
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका १०१०/ ०२ राम/ प्र.क्र. ०४/ ३ स, दि. २७.१०.२०१०.
३) शासन निर्णय क्रमांक:ससाका १०१३/१२-मंत्री/प्र.क्र.१८/३स,दिनांक ३१.५.२०१४
४) शासन निर्णय समक्रमांक ६.९.२०१४.
५) शासन शुध्दीपत्रक समक्रमांक दि.११.९. २०१४.

**<u>प्रस्तावना</u> :-**

केंद्र शासनाने ऑगस्ट १९९८ मध्ये साखर धोरण शिथील केल्यानंतर या नवीन धोरणानुसार राज्यामध्ये नवीन सहकारी साखर कारखान्याची नोंदणी करण्यासंदर्भात तत्कालीन मंत्री (सहकार) यांच्या अध्यक्षतेखाली साखर उद्योगातील तज्ञ व्यक्तींची एक समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीच्या शिफारशी नुसार प्रतिदिन १२५० मे.टन गाळप क्षमतेच्या कारखान्यांची उभारणी करण्याचे धोरण ठरविण्यात आले. नवीन नोंदणी झालेल्या प्रतिदिन १२५० मे.टन गाळप क्षमतेच्या यंत्रसामुग्रीची किंमत राज्य सल्लागार समितीने १४२९.०० लाख एवढे निश्चित केली होती. त्या अनुषंगाने दि. ४.८.२००० च्या शासन निर्णयान्वये प्रतिदिन १२५० मे.टन गाळप क्षमतेच्या सहकारी साखर कारखान्याची प्रमाणित किंमत २८००.०० लाख इतकी निश्चित करण्यात आली होती. तथापि सिमेंट, स्टील व तद्नुषंगिक बाबींच्या दरामध्ये गेल्या १० वर्षात झालेली वाढ विचारात घेऊन दि. ६.८.२०१० रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत १२५० टीसीडी क्षमतेच्या साखर कारखान्याची प्रमाणित किमत रु.२८.०० कोटीवरुन रु.४५.०० कोटी एवढी निश्चित करण्यास मान्यता देण्यात आली. त्यानुषंगाने दिनांक २७ ऑक्टोबर, २०१० रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला.

उभारणीखालील १२५० टीसीडी क्षमतेच्या ७ सहकारी साखर कारखान्याना प्रमाणित किंमत रु.२८.०० कोटी विचारात घेऊन देय असलेले शासकीय भागभांडवल यापूर्वी वितरित करण्यात आले आहे.सदर कारखान्यांना सुधारित प्रमाणित किंमत रु.४५.०० कोटी विचारात घेऊन वाढीव शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत दिनांक ७.५.२०१४ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे त्यानुषंगाने दिनांक ३१ मे,२०१४ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. या निर्णयानुसार

उभारणीखालील ७ सहकारी साखर कारखान्यांना प्रमाणित किंमत रु.४५.०० कोटी विचारात घेऊन वाढीव शासकीय भागभांडवल मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**:-

दिनांक ७.५.२०१४ रोजी घेतलेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत उभारणीखालील प्रतिदिन १२५० मे.टन गाळप क्षमतेच्या १) भाऊसाहेब बिराजदार सहकारी साखर कारखाना म.उस्मानाबाद, २)बाणगांगा सहकारी साखर कारखाना म.उस्मानाबाद ३) टोकाई सहकारी साखर कारखाना म.हिंगोली ४) छत्रपती सहकारी साखर कारखाना म.बीड, ५) शरद सहकारी साखर कारखाना म.औरंगाबाद ६) शिवशक्ती सहकारी साखर कारखाना म.कोळसूर,उस्मानाबाद या कारखान्यांना १:५ या प्रमाणात व ७) श्री संत कुर्मदास सहकारी साखर कारखाना म. सोलापूर या पश्चिम महाराष्ट्रातील कारखान्यास विशेष बाब म्हणून १:३ ऐवजी १:५ या प्रमाणात त्यांना प्रकल्प उभारणीसाठी आलेल्या प्रत्यक्ष खर्चाच्या अथवा सुधारित प्रकल्प किंमतीनुसार १:५ या प्रमाणात यापैकी जे कमी होईल त्यानुसार शासकीय भांगभांडवल मंजूर करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार १) भाऊसाहेब बिराजदार सहकारी साखर कारखाना म.उस्मानाबाद, २) बाणगांगा सहकारी साखर कारखाना म.उस्मानाबाद ३)टोकाई सहकारी साखर कारखाना म.हिंगोली ४) छत्रपती सहकारी साखर कारखाना म.बीड, ५) श्री संत कुर्मदास सहकारी साखर कारखाना म. सोलापूर या कारखान्यांना दि.६.९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये एकूण रु.१६९९.४० लाख एवढे शासकीय भागभांडवल वितरीत करण्यात आले आहे. सदर कारखान्यांना देय असलेल्या शासकीय भागभांडवलापैकी उर्वरीत शासकीय भागभांडवल खालीलप्रमाणे मंजूर करण्यास वित्तीय व प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखांत)

| अ.क्र. | सहकारी साखर कारखान्याचे नांव | देय वाढीव शासकीय भागभांडवल | दिनांक ११.९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये ६० टक्केच्या मर्यादेत वितरित केलेले शासकीय भागभांडवल | वितरीत करावयाचे उर्वरीत शासकीय भागभांडवल |
|---|---|---|---|---|
| १ | भाऊसाहेब बिराजदार | ५६६.५२ | ३३९.९१ | ११६.६३ |
| २ | बाणगंगा | ५६६.२८ | ३३९.७६ | ११६.६३ |
| ३ | टोकाई | ५६६.५२ | ३३९.९१ | ११६.६३ |
| ४ | छत्रपती | ५६१.४१ | ३३९.९१ | ११६.६३ |
| ५ | श्री संत कुर्मदास | ५६६.५२ | ३३९.९१ | ११६.६३ |
| ६ | शरद | ३५०.४५ | --- | ११६.६६ |
| **एकूण** | | **३१७७.७०** | **१६९९.४०** | **६९९.८१** |

२. या बाबीसाठी सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पात
मागणी क्रमांक व्ही-३,
४४२५ सहकारावरील भांडवली खर्च,
सहकारी साखर कारखाने
(०३ )पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना
(००)(०३)सहकारी साखर कारखान्यांना भागभांडवली अंशदान (४४२५ ०३०२)
३२ अंशदाने

या लेखाशिर्षाखाली रु. २३,९९,२१,०००/- (रुपये तेवीस कोटी, नव्याण्णव लाख, एकवीस हजार फक्त ) एवढी तरतूद सुधारित अंदाजामध्ये मंजूर करण्यात आली आहे. त्यातून दि. ३१/५/२०१४ रोजीच्या शासन निणर्यास अनुसरुन दि. ६/९/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये उपरोक्त ६ कारखान्यांपैकी ५ कारखान्यांना ६० टक्क्याच्या मर्यादेत रु. १६९९.४० लाख इतकी रक्कम वितरित करण्यात आलेली असून आता रु. ६,९९,८१,०००/- इतक्या रक्कमेची तरतूद शिल्लक आहे. सदर तरतूदीमधून वरील कारखान्यांना मंजूर केलेले शासकीय भागभांडवल रु.६९९.८१ लाख ( रु. सहा कोटी, नव्याण्णव लाख, एक्याऐंशी हजार फक्त ) वितरित करण्यात येऊन सदर खर्च उपरोक्त लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

३. शासकीय भाग भांडवलापैकी मंजूर करण्यात आलेले रु.६९९.८१ लाख ( रु. सहा कोटी नव्याण्णव लाख, एक्याऐशी हजार फक्त ) इतक्या रक्कमेचे आहरण करुन संबंधितांना संवितरण करण्याकरिता लेखा अधिकारी, साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच साखर आयुक्त महाराष्ट्र राज्य पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येणारी शासकीय भाग भांडवलाची रक्कम कारखान्यांच्या बँक खाती वर्ग करण्यास संबंधित कारखान्यांनी लेखी संमती दिलेली आहे. लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी जिल्हा कोषागार अधिकारी कार्यालय पुणे येथून आहरण करुन सदर रक्कमेचा धनादेश खालील सहकारी साखर कारखान्याच्या नांवे त्यांच्यासमोर दर्शविलेल्या रक्कमेप्रमाणे काढण्यात यावा :-

| | |
|---|---|
| महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., खाते - भाऊसाहेब बिराजदार सहकारी साखर कारखाना म., उस्मानाबाद<br>Maharashtra State Co-Operative Bank Ltd., A/C - Bhausaheb Birajdar Sahakari Sakhar Karkhana Ltd., Osmanabad | रुपये १,१६,६३,०००/-<br>Rs.1,16,63,000/- |
| महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., खाते - बाणगंगा सहकारी साखर कारखाना म.उस्मानाबाद<br>Maharashtra State Co-Operative Bank Ltd., A/C - Banganga Sahakari Sakhar Karkhana Ltd, Osmanabad | रुपये १,१६,६३,०००/-<br>Rs. 1,16,63,000/- |

| | |
|---|---|
| महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., खाते - टोकाई सहकारी साखर कारखाना म.हिंगोली<br>Maharashtra State Co-Operative Bank Ltd., A/C -<br>Tokai Sahakari Sakhar Karkhana Ltd, Hingoli. | रुपये १,१६,६३,०००/-<br>Rs. 1,16,63,०००/- |
| महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., खाते - छत्रपती सहकारी साखर कारखाना म., बीड<br>Maharashtra State Co-Operative Bank Ltd., A/C -<br>Chhatrapati Sahakari Sakhar Karkhana Ltd.,Beed | रुपये १,१६,६३,०००/-<br>Rs. 1,16,63,०००/- |
| सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि., जि.सोलापूर, खाते -<br>श्री संत कुर्मदास सहकारी साखर कारखाना म.सोलापूर<br>Solapur District Central Co-Op. Bank Ltd.,District Solapur A/C -<br>Shri Sant Kurmadas Sahakari Sakhar Karkhana Ltd.,Solapur | रुपये १,१६,६३,०००/-<br>Rs. 1,16,63,०००/- |
| शरद सहकारी साखर कारखाना म.औरंगाबाद<br>Sharad Sahakari Sakhar Karkhana Ltd., Aurangabad | रु. १,१६,६६,०००/-<br>Rs. 1,16,66,०००/- |
| **एकूण** | **रुपये ६,९९,८१,०००/-** |

४. वरील कारखान्यांना महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने प्रकल्प उभारणीसाठी शासन थकहमीवर मध्यम मुदत कर्ज मंजूर केले आहे. या कर्जाची व्याजासह परतफेड कारखान्यांनी वरील प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या शासकीय भागभांडवलातून करण्यात यावी. तसेच काही कारखान्यांना इतर बॅकांनी/वित्तीय संस्थांनी प्रकल्प उभारणीसाठी तसेच अन्य प्रयोजनासाठी मंजूर केलेले कर्ज व त्यावरील व्याजाची परतफेड सुध्दा मंजूर करण्यात आलेल्या शासकीय भागभांडवलातून करण्यात यावी.

५. सदर कारखान्यांना दि. ६/९/२०१४ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या शासकीय भाग भांडवलातून कारखान्यांना राज्य सहकारी बँकेने मंजूर केलेल्या मध्यम मुदत कर्जाची परतफेड करणे आवश्यक होते. त्यानुसार कारखान्यांनी खालीलप्रमाणे बँकेने मंजूर केलेल्या मध्यम मुदत कर्जाची परतफेड केलेली असून कारखान्यांकडे खालीलप्रमाणे रक्कम शिल्लक आहे. सदर रक्कम संबंधित कारखान्यांनी एक महिन्याच्या आत

राज्य सहकारी बँकेकडे जमा करावी. सदर रक्कम एक महिन्याच्या आत राज्य सहकारी बँकेकडे जमा न केल्यास त्यावर रक्कम जमा करण्याच्या कालावधीपर्यंत प्रचलित व्याजदराने व्याजाची आकारणी करण्यात येईल.

| अ.क्र. | कारखान्याचे नाव | राज्य सहकारी बँकेकडे जमा करावयाची रक्कम |
|---|---|---|
| १ | भाऊसाहेब बिराजदार स.सा.का. | रु. ६७.३७ लाख |
| २ | बाणगंगा स.सा.का. | रु. ६६.८८ लाख |
| ३ | टोकाई स.सा.का. | रु. ६४.१७ लाख |
| ४ | छत्रपती स.सा.का. | रु. १५.२२ लाख |

६. शरद सहकारी साखर कारखाना म.औरंगाबाद कारखान्यास मंजूर केलेले शासकीय भागभांडवल वितरीत करण्यापूर्वी साखर आयुक्त यांनी सदर कारखान्याकडून सुधारीत प्रकल्प किंमतीनुसार स्वभागभांडवल ६ महिन्यांच्या आत उभारण्यात येईल असे हमीपत्र कारखान्याचे अध्यक्ष / कार्यकारी संचालक यांच्याकडून लिहून घ्यावे व त्याप्रमाणे कारखान्याकडून कार्यवाही होत असल्याबाबतचे संनियंत्रण साखर आयुक्त, पुणे यांनी करावे.

७. श्री संत कुर्मदास सहकारी साखर कारखान्यास शासनाने मंजूर केलेल्या कर्जापोटी मालमत्तेचे गहाणखत शासनास करुन दिलेले आहे. तथापि कारखान्याने सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅकेकडून उभारलेल्या मध्यम मुदत कर्जापोटी कारखान्याच्या मालमत्तेवर सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅकेचा समसमान श्रेणीचा हक्क प्रस्थापित करुन देण्यास शासनाचे ना-हरकत प्रमाणपत्र देण्यात आले आहे. ही बाब विचारात घेता श्री संत कूर्मदास सहकारी साखर कारखान्याने कर्जाची व्याजासह परतफेड मंजूर करण्यात येणा-या शासकीय भाग भांडवलातून करावी. सदर कारखान्यास यापूर्वी दि. ६/९/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या भाग भांडवलापैकी रु. १९०.०० लाख कारखान्याने सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेत भरणा केलेले आहेत. उर्वरित रक्कम रु. १४९.९१ लाख कारखान्याने एक महिन्यात सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेत भरणा करावी. सदर मुदतीत रक्कम भरणा न केल्यास सदर रक्कम भरणा होण्याच्या कालावधीपर्यंत प्रचलित व्याजाच्या दराप्रमाणे व्याजाची आकारणी करण्यात येईल.

८. कारखान्यांना वरील प्रमाणे मंजूर केलेल्या रक्कमेचा विनियोग कारखाना आवश्यक त्याच बाबीसाठी करीत आहे याबाबतचे नियंत्रण साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावे व त्याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा. कारखान्यांना मंजूर रक्कम वितरित करण्यापूर्वी सोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” मधील अटी व शर्ती बंधनकारक असल्याचे संबंधित कारखान्याकडून लिहून घेण्यात यावे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८१/१५, व्यय २,दिनांक ३१ मार्च, २०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संगणक क्रमांक २०१५०३३०१९५७४८३१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Balasaheb
Ishwar Sawant

Digitally signed by Balasaheb Ishwar Sawant
DN: CN = Balasaheb Ishwar Sawant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.04.01 11:05:14 +05'30'

**( बा.ई.सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) सर्व मंत्री/राज्यमंत्री
२) महालेखापाल-१ महाराष्ट्र मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ( प्रत्येकी दोन प्रती)
३) महालेखापाल-२ महाराष्ट्र नागपूर ( २ प्रती)
४) प्रधान महालेखाकार Voucher Level Computer Section ,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
५) प्रधान महालेखाकार (वाणिज्यिक) महाराष्ट्र राज्य,मुंबई.
६) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, कृषि महाविद्यालय आवार, पुणे.
८) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०) प्रादेशिक सहसंचालक (साखर), नांदेड/औरंगाबाद/पुणे.
११) विशेष लेखा परिक्षक वर्ग-१ सहकारी संस्था, (साखर) उस्मानाबाद/बीड/परभणी/सोलापूर/ औरंगाबाद.
१२) वित्त विभाग, (व्यय-२/अर्थसंकल्प -१३), मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१३) नियोजन विभाग (कार्यासन १४३१) मंत्रालय, मुं बई-४०००३२.
१४) व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, फोर्ट, मुंबई.
१५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ, साखर भवन, नरिमन पॉईट, मुंबई.
१६) कार्यकारी संचालक, भाऊसाहेब बिराजदार सहकारी साखर कारखाना म.उस्मानाबाद
१७) कार्यकारी संचालक, बाणगंगा सहकारी साखर कारखाना म.उस्मानाबाद.
१८) कार्यकारी संचालक, टोकाई सहकारी साखर कारखाना म.हिंगोली,
१९) कार्यकारी संचालक, छत्रपती सहकारी साखर कारखाना म.बीड
२०) कार्यकारी संचालक, श्री संत कुर्मदास सहकारी साखर कारखाना, सोलापूर
२१) कार्यकारी संचालक, शरद सहकारी साखर कारखाना म.औरंगाबाद
२२) निवडनस्ती ३ स

**********************

शासन निर्णय क्र. ससाका १०१४/प्र.क्र. ५७/३स, दि. ३१ मार्च,२०१५.

परिशिष्ट "अ"

सहकारी साखर कारखान्यांना शासकीय भागभांडवल मंजूरीसाठी अटी व शर्ती

१) संस्था निम्नदर्शित कालावधीमध्ये सहा महिन्यांच्या आंत शासनास ५० टक्के विमोचनीय पसंती भाग देईल.

(अ) कारखान्यांकडून त्यास शासनातर्फे मिळालेल्या भागभांडवलाच्या रक्कमेपोटी शासनास १० वर्षीय "विमोचनीय पसंती भाग" दिले जातील.

(ब) शासनामार्फत मिळालेल्या भागभांडवलाच्या उर्वरित ५० टक्के रक्कमेचे १५ वर्षीय विमोचनीय पसंती भाग दिले जातील.

२) कारखान्याने शासनास दिलेल्या विमोचनीय पसंती भागाची परतफेड करण्यासाठी लगेचच त्यास निव्वळ नफा मिळण्यापूर्वी भागभांडवल "विमोचनीय राखीव निधी" सुरु करावा आणि साखर आयुक्तांनी काही भाग किमान एकूण शासकीय भागभांडवलाच्या १/१५ इतकी रक्कम दरवर्षी हया फंडात जमा करावी.

३) उपरोक्त अट क्र.(२) मध्ये नमूद केलेल्या भागभांडवल विमोचन राखीव निधीच्या जागी कारखान्यांच्या पोट नियमात जर अशी तरतूद केली असेल तर त्या नुसारचे अधिकारात सभासदांकडून ठेवी (बिनपरतीच्या) स्वीकारुन शासनाचे भागभांडवलाचे विमोचनासाठी वेगळा निधी उभारण्याचा विकल्प कारखान्यास राहील. कारखान्याच्या ज्या संबंधित पोट नियमात अशी स्पष्ट तरतूद असली पाहिजे कि, ठेव म्हणून ठेवलेली रक्कम रोखीत परतफेड केली जाणार नाही. परंतु, शासकीय भागभांडवलाचे विमोचनाची विर्निदिष्ट मुदत पूर्ण झाल्यानंतर प्रत्येक उत्पादक भागधारकांच्या खात्यावर असलेल्या रक्कमेच्या मुल्याचा भाग मिळण्यास तो पात्र राहील.

४) " भागभांडवली विमोचन निधी" आणि वर अट क्रमांक (३) मध्ये नमूद केलेला निधी साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे सूचनेनुसार गुंतविता येईल.

५) कारखान्यास त्यांच्या सभासदांस तो सभासद म्हणून असतांना शासनाचे संपूर्ण भागभांडवल परत केल्याशिवाय सभासदास भागभांडवलाचा भाग परत करता येणार नाही. जर सभासद संस्था अवसायनात निघाली तर साखर आयुक्त यांचेकडून घालण्यात येणा-या अटी व नियमास अधीन राहून सभासदाचे भागभांडवल परत करता येईल.

६) संस्थेला कोणत्याही वर्षी एका पेक्षा जास्त हफ्ते अदा करण्याची मुभा राहील किंवा संपूर्ण शासकीय भागभांडवलाची रक्कम विहित कालावधीत अदा करील.

७) संस्था शासनाचे पूर्व परवानगीने व शासनाने घालून दिलेल्या पध्दतीने व्यवस्थापकीय संचालकांची नेमणूक करील. व्यवस्थापकीय संचालकांची नेमणूक आणि सेवा या बाबतीतील अटी व नियमात शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय बदल करता येणार नाही.

८) कारखाना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक बीबीसी १०६४/३-जे, दिनांक ९ एप्रिल, १९६३ नमूद केलेल्या चार घटकांतील मागासवर्गीय उमेदवारासाठी नोकरीत ३४ टक्के जागा राखून ठेवील. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०७१/६४५४/डी,

दिनांक २९ मार्च, १९७२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे उपरोक्त ३४ टक्के धरुन आर्थिक दृष्टया दुर्बल लोकांचा समावेश धरुन एकूण ५० टक्के जागा राखून ठेवल्या जातील. ही टक्केवारी कारखान्यांत मागासलेले उमेदवार व आर्थिक दृष्टया दुर्बल उमेदवार, नवीन नोकर भरती करताना त्यांना योग्य प्रतिनिधीत्व मिळण्याच्या दृष्टीने लागू करण्यात येईल. शासनाच्या प्रचलित आदेशानुसार बढतीचे प्रकरणात २४ टक्के रिकाम्या जागा सेवेत असलेल्या अनुसूचित जाती/नवबौध्द अनुसूचित जमाती, विमुक्त जाती आणि भटक्या जमाती व्यक्तीसाठी राखून ठेवल्या जातील.

९) आरक्षण पुढे चालू ठेवण्याबाबत जर आरक्षित केलेल्या कोणत्याही जागेकरीता मागासवर्गीय प्रवर्गातील एखादया विशिष्ठ प्रवर्गाचा योग्य उमेदवार नियुक्तीसाठी उपलब्ध होत नसेल तर ते आरक्षण पुढीज ५ वर्षे पर्यंत तरतूदीच्या अधीन राहून पुढे चालू ठेवण्यात यावे. तथापि, कोणत्याही भरती प्रसंगी उपलब्ध झालेल्या एकूण जागापैकी आरक्षित पदे मिळून ५० टक्के पेक्षा जास्त पदे एका वेळी उपलब्ध होणार नाही. जर दोन पदे रिक्त असतील तर त्यापैकी एकच पद राहील तर ते पद अनरक्षित समजण्यात येईल. भरतीच्या वेळी ५० टक्के पेक्षा जास्त होणा-या आरक्षित पदांचे आरक्षण त्यानंतरच्या भरती प्रसंगी चालू ठेवण्यात यावे. मात्र हे आरक्षण ५ वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी पुढे चालू ठेवता येणार नाही. या अटीच्या अधिन राहील.

१०) नवीन सहकारी साखर कारखान्यांच्या बाबतीत त्यांनी कारखान्यांचे स्थायी काम करणे, वसाहत, मशिनरीचे फाऊंडेशन काम इ. बाबत साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या पूर्व परवानगीनेच मागणी नोंदवावी.

११) कारखाना शासन, भारतीय औद्योगिक वित्त महामंडळ किंवा कारखान्याच्या प्रकल्पास अर्थसहाय्य करणा-या संस्थेची पूर्व संमती घेतल्याशिवाय कोणतेही डिबेंचर्स आणि कॉन्ट्रॅक्ट लोन काढणार नाही किंवा आपल्या कर्ज घेण्याच्या शक्तीचा वापर करणार नाही.

१२) शासन घालून देईल अशा पध्दतीनुसार “लाभांश समानता निधी” उभारल्याशिवाय आणि शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कारखाना द.सा.द.शे. ६ टक्के पेक्षा अधिक लाभांश देऊ शकणार नाही . “भागभांडवल विमोचन निधी” नंतर लाभांश समानता निधीस प्राधान्य राहील.

१३) शासनाने खरेदी केलेले भाग प्रथमत : “पूर्ण किंमत देय” भाग असतील की, ज्यास संस्था गुंडाळण्यात (अवसायनात) येताना परत मिळण्याचा प्रथम हक्क राहील. परंतु तत्पूर्वी नफ्यातून किंवा उपरोक्त अट क्रमांक (२) आणि (३) मधून विमोचनीय राहील.

१४) शासकीय भागभांडवल वापरण्यापूर्वी कारखाना वरील अटीच्या संबंधाने त्यांच्या पोट नियमात सुधारणा करील.

१५) जर महालेखापाल मुंबई/नागपूर यांनी कारखान्यांच्या हिशोबांची तपासणीची आवश्यकता दर्शविली तर कारखान्यांना हिशोबांचे सर्व कागदपत्र महालेखापाल, मुंबई/नागपूर यांचेकडून तपासून घेण्यासाठी सादर करील.

१६) कारखाना त्याचा संपूर्ण विमा व्यवसाय महाराष्ट्र शासनाचे इन्श्युरन्स फंडाबरोबर करील.

१७) संस्था तिच्या कार्यक्षेत्रात नोंदणीकृत असलेल्या मध्यवर्ती घाऊक भांडाराशी संलग्न राहील.

१८) शासकीय भागभांडवल मिळाल्याचे तारखेपासून ६ महिन्यांच्या आत कारखाना भाग दाखला/दाखल देईल, नाहीतर संपूर्ण भागभांडवलाची रक्कम परत करावी लागेल.

१९) यासाठी घालण्यात आलेल्या अटींचा भंग केल्यास, राज्य शासनास संपूर्ण अगर काही अंशी भागभांडवलाची रक्कम परत घेण्याचा अधिकार राहील.

२०) कारखाना, आर्किटेक्ट आणि स्थायी कामांसाठी कॉन्ट्रक्टर यांची नेमणूक साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अनुमतीने करेल.

२१) सेवेत भरतीसाठी शासनाने मान्य केलेला आकृतीबंध साखर कारखान्यांनी मान्य केला पाहिजे व त्या आकृतिबंधाच्या मर्यादेतच नोकर भरती करण्याची दक्षता घ्यावी.

२२) साखर कारखान्यांच्या महत्त्वाच्या पदावर काम करणा-या व्यक्तींची उदा. मुख्य शेतकी अधिकारी, सचिव, मुख्य लेखापाल, चिफ केमिस्ट, चिफ इंजिनिअर्स व मुख्य उपविकास अधिकारी इ. अधिका-यांची नेमणूक योग्य त्या पात्र असलेल्या व अनुभव असलेल्या व्यक्तीमधूनच करण्यात यावी व या नेमणुकींना साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची मान्यता घ्यावी व अशा अधिकारी प्रतिनियुक्तीवर घेणे साखर कारखान्यास बंधनकारक राहील.

२३) भागभांडवल परतफेड निधीमध्ये पैसा न गुंतविता तो कारखान्याने स्वत:च्या व्यवहारात वापरला तर त्या रक्कमेवर वित्तिय संस्था, केंद्रिय वित्तिय संस्था त्याच्या कर्जावर ज्या प्रमाणे व्याज आकारणी करतात त्याप्रमाणे व्याज आकारण्यात येईल. सदर निधीची गुंतवणूक महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० च्या तरतुदीनुसार करण्यात यावी.

२४) प्रथम नामनिर्देशित झालेल्या मंडळाचा कालावधी संपल्यानंतर कारखान्याचे निर्वाचित मंडळ असेल.

२५) संस्था व्यवसायिक व अर्हता पात्र "मुख्य कार्यकारी" (चीफ एक्झीक्युटिव्ह) ची नियुक्ती करील.

२६) राष्ट्रीय सहकारी विकास निगमाला, कारखान्याच्या संचालक मंडळावर त्यांचा प्रतिनिधी नाम निर्देशित करण्याचा हक्क राहील. संचालक मंडळाच्या बैठकीस उपस्थित राहणा-या प्रतिनिधीचा होणारा खर्च कारखान्याकडून केला जाईल.

२७) प्लॉट आणि मशीनरीच्या ऑर्डर्स राज्यस्तरीय सल्लागार समिती कडून अंतिम केल्या जातील.

२८) या आदेशात निर्दिष्ठ केलेल्या अटींचे उल्लंघन झाल्यास शासकीय भागभांडवलाच्या तसेच कर्जाच्या हिश्श्याची संपूर्ण अथवा काही रक्कम काढून घेण्याचा अधिकार शासनाला राहील किंवा शासकीय भागभांडवलाच्या /कर्जाच्या/ हिश्श्याच्या संदर्भात शासन भविष्यात वेळोवेळी ज्या अटी व शर्ती लागू करील त्या कारखान्यांवर बंधनकारक राहतील.

२९) अस्तित्वात असलेल्या अटी सुधारणा करण्याचा, किंवा आणखी अटींची भर घालण्याचा अधिकार शासनास राहील.

------------